अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१९-२०
“ २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१) ” मागणी क्रमांक वाय-२

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: २० मार्च, २०२०

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि. १ एप्रिल, २०१९
२) शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दि.१६ एप्रिल, २०१९
३) शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८ जुलै, २०१९
४) शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दि. २० ऑगस्ट, २०१९
५) शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दि. ७ ऑक्टोबर, २०१९
६) शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दि.१९ ऑक्टोबर, २०१९
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. २२ जानेवारी, २०२०
८) शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दि.१७ फेब्रुवारी, २०२०
९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. १३ मार्च, २०२०

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतन खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१९-२० करिता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी एकूण रुपये १७७,४५,००,०००/-

(अक्षरी रुपये एकशे सत्त्याहत्तर कोटी पंचेचाळीस लाख फक्त ) इतके अनुदान वाचा मधील अनुक्रमांक २, ४, ५, व ८ च्या शासन निर्णयान्वये संबंधित सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहेत.

२. आता वित्त विभागाने सुधारित अंदाज निश्चित केले असून दिनांक १३ मार्च, २०२० च्या परिपत्रकान्वये सन २०१९-२० करीता सुधारित अंदाजाच्या मर्यादेतील वेतन निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. जिल्हा परिषदांनी उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत केलेला प्रत्यक्ष खर्च विचारात घेऊन जिल्हा परिषदांना वेतन निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णयः-

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतन खर्च भागविण्यासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)” या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखाली रुपये २३,२३,००,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी तेवीस लाख फक्त ) इतके अनुदान या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविल्यानुसार संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. वितरीत केलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वितरीत केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची

दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९ / प्र.क्र.९२ / अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी, २०२० व दिनांक १३ मार्च, २०२० अन्वये दिलेल्या सहमती अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१३४१२४२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.03.20 14:46:02 +05'30'

**गणेश पवार**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद, सर्व

२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
५. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
६. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
११.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२.अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१४.कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१५.ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१६. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४१९/प्र.क्र.५६/पापु-२३, दिनांक २० मार्च, २०२० सोबतचे सहपत्र

मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)"

| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०१९-२० करीता या शासन निर्णयान्वये वितरीत अनुदान | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| २ | पालघर | ४५००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| ३ | रायगड | ५३००००० | रूपये त्रेपन्न लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | १५४००००० | रूपये एक कोटी चोपन्न लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |
| ६ | नाशिक | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |
| ७ | धुळे | २३००००० | रूपये तेवीस लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | ५५००००० | रूपये पंचावन्न लाख फक्त |
| ९ | जळगांव | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |
| १० | अहमदनगर | ७४००००० | रूपये चौ-याहत्तर लाख फक्त |
| ११ | पुणे | ६४००००० | रूपये चौसष्ठ लाख फक्त |
| १२ | सातारा | १२५००००० | रूपये एक कोटी पंचवीस लाख फक्त |
| १३ | सांगली | ३४००००० | रूपये चौतीस लाख फक्त |
| १४ | सोलापूर | ११५००००० | रूपये एक कोटी पंधरा लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | ९६००००० | रूपये श्याण्णव लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | १३७००००० | रूपये एक कोटी सदतीस लाख फक्त |
| १७ | जालना | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |
| १८ | परभणी | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| १९ | हिंगोली | २८००००० | रूपये अठ्ठावीस लाख फक्त |
| २० | बीड | १०१००००० | रूपये एक कोटी एक लाख फक्त |
| २१ | नांदेड | ७६००००० | रूपये श्याहत्तर लाख फक्त |
| २२ | उस्मानाबाद | ७५००००० | रूपये पंच्याहत्तर लाख फक्त |
| २३ | लातूर | १४२००००० | रूपये एक कोटी बेचाळीस लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | ५७००००० | रूपये सत्तावन्न लाख फक्त |
| २५ | अकोला | ७६००००० | रूपये श्याहत्तर लाख फक्त |
| २६ | वाशिम | ३५००००० | रूपये पस्तीस लाख फक्त |
| २७ | अमरावती | ९९००००० | रूपये नव्याण्णव लाख फक्त |
| २८ | यवतमाळ | ५३००००० | रूपये त्रेपन्न लाख फक्त |
| २९ | वर्धा | ३५००००० | रूपये पस्तीस लाख फक्त |
| ३० | नागपूर | १०६००००० | रूपये एक कोटी सहा लाख फक्त |
| ३१ | भंडारा | २९००००० | रूपये एकोणतीस लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | ६७००००० | रूपये सदुसष्ठ लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | ३७००००० | रूपये सदतीस लाख फक्त |
| ३४ | गडचिरोली | २२००००० | रूपये बावीस लाख फक्त |
| एकूण | | २३२३००००० | रूपये तेवीस कोटी तेवीस लाख फक्त |

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.03.20 14:46:56 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन